**उच्चश्रेणी लघुलेखक पदावरुन निवडश्रेणी लघुलेखक पदावर तदर्थ पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५१६/प्र.क्र.१६६/१४-अ**
खोली क्र.५५७/५५९ (विस्तार), पाचवा मजला, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १७ जुलै २०१७

**शासन आदेश**

मंत्रालयीन विभागातील खालील उच्चश्रेणी लघुलेखकास सन २०१६-२०१७ या वर्षाच्या निवडसूचीमधून निवडश्रेणी लघुलेखक पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविलेल्या विभागात करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उच्चश्रेणी लघुलेखकाचे नांव | व्यक्तीचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | निवडश्रेणी लघुलेखक पदावर पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.गु.रा.चौधरी (मराठी) | अज | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग (सध्या प्रतिनियुक्ती राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक) | अल्पसंख्याक विकास विभाग |

२. वरील उच्चश्रेणी लघुलेखकास निवडश्रेणी लघुलेखक पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती त्याचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रस्तावित/प्रलंबित नाही, या धारणेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

३. वरील उच्चश्रेणी लघुलेखकाची तदर्थ पदोन्नती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २८.११.२०१४ रोजी दिलेल्या निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ च्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहील.

४. सदर तदर्थ पदोन्नती अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित निवडश्रेणी लघुलेखक नियुक्त होईपर्यंत यापैकी जे लवकर घडेल तेवढ्या कालावधीकरिता असेल.

५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी १२०७/प्र.क्र.५३/०८/१६-ब, दिनांक १६.०६.२००८ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राअभावी पदोन्नती न दिल्याने राखून ठेवलेल्या निवडश्रेणी लघुलेखक पदावर श्री.चौधरी यांना देण्यात येत असलेली तदर्थ पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची आहे.

६. जात वैधता प्रमाणपत्रा अभावी पदोन्नती न दिल्याने पद राखून ठेवलेल्या संबंधित उच्चश्रेणी लघुलेखकाने जात वैधता प्रमाणपत्र सादर केल्यावर त्यांना पदोन्नती देण्यात येण्यात येईल. परिणामस्वरुप या आदेशान्वये श्री.चौधरी, उच्चश्रेणी लघुलेखक यांना निवडश्रेणी लघुलेखक पदावर देण्यात आलेली निव्वळ तात्पुरती पदोन्नती संपुष्टात आणली जाईल. जात वैधता प्रमाणपत्राअभावी पदोन्नती न दिल्याने पद राखून ठेवलेल्या संबंधित उच्चश्रेणी लघुलेखकाने जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास वरील उच्चश्रेणी लघुलेखकाची तदर्थ पदोन्नती १ दिवसाचा तांत्रिक खंड देवून पुढे चालू ठेवता येईल. या निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी उक्त नमूद उच्चश्रेणी लघुलेखकास नियमित पदोन्नतीचा, सेवाज्येष्ठतेचा किंवा आणखी कोणताही हक्क प्राप्त होणार नाही.

७. श्री.गु.रा.चौधरी, उच्चश्रेणी लघुलेखक हे सदर पदोन्नती आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसांत पदोन्नतीच्या पदावर रुजू झाले नाहीत तर त्यांनी पदोन्नती नाकारली असे गृहित धरुन सदर तदर्थ पदोन्नती रद्द करण्यात येईल.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१७११५२४२९३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.07.17 11:49:49 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री.गु.रा.चौधरी, उच्चश्रेणी लघुलेखक, राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक यांचे कार्यालयामार्फत

**प्रत,**

१. अ.मु.स./प्र.स./सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग/अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (संबंधित विभागामार्फत)
२. सह/उप सचिव (आस्थापना), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग/अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक.
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. निवड नस्ती/संग्रहार्थ (साप्रवि/१४-अ)